**नवी मुंबई, बेलापूर येथील कोकणभवन उपाहारगृहातील महानगर गॅस लिमिटेडद्वारे पाईपलाईन जोडणी घेणे व त्या अनुषंगिक कामास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**

**शासन निर्णय क्रमांक आस्था २०१९/प्र.क्र.१९४/मंउका,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :२४/१०/२०१९

**प्रस्तावना :**

कोकण भवन, बेलापूर-सीबीडी, नवी मुंबई इमारतीमधील शासकीय कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी नाश्ता व जेवणाच्या सोयीसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली कोकणभवन उपाहारगृह चालविले जाते. सद्यस्थितीत कोकणभवन उपाहारगृहात खाद्यपदार्थ तयार करण्यासाठी एलपीजी सिलेंडरमधून गॅसचा वापर केला जातो. कोकणभवन इमारतीच्या अग्निसुरक्षेच्या दृष्टीने कोकणभवन उपाहारगृहात वापरात असलेले एलपीजी सिलेंडर ऐवजी महानगर गॅस लिमिटेड यांचेमार्फत पाईपलाईनद्वारे गॅस पुरवठा करण्यासाठी गॅस पाईपलाईन (PNG) जोडणी करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

कोकण भवन, बेलापूर-सीबीडी, नवी मुंबई इमारतीमधील शासकीय कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी नाश्ता व जेवणाच्या सोयीसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली चालविण्यात येणाऱ्या कोकण भवन उपाहारगृहासाठी महानगर गॅस लिमिटेडकडून पाईपलाईनद्वारे गॅस पुरवठा(PNG) करुन घेण्यात यावी. कोकण भवन उपाहारगृहात पाईपलाईन गॅस (PNG) जोडणी घेण्यासाठी महानगर गॅस लिमिटेड यांचेकडे सुरक्षा अनामत रक्कम व नोंदणी शुल्क भरणे तसेच महानगर गॅस लिमिटेडमार्फत बसविण्यात येणाऱ्या गॅस मीटरपासून उपाहारगृहाच्या स्वयंपाकगृहातील गॅस शेगड्यापर्यंत लागणारी पाईपलाईन व इतर अनुषंगिक कामे महानगर गॅस लिमिटेड यांचेकडील नोंदणीकृत कंत्राटदारांकडून करुन घ्यावयाची आहेत. सदर कामासाठी खालीलप्रमाणे अंदाजे खर्च येणार आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | महानगर गॅस लिमिटेड यांचेकडे पाईपलाईन गॅस (PNG) जोडणी घेण्यासाठी सुरक्षा अनामत रक्कम व नोंदणी शुल्क अदा करणे | ६५,६९६/- |
| २) | महानगर गॅस लिमिटेडच्या गॅस मीटरपासून उपाहारगृहाच्या स्वयंपाकगृहातील गॅस शेगड्यांपर्यन्त लागणारी पाईपलाईन व इतर अनुषंगिक कामे करणे | ५१,३१,७०३/- |
| | **एकूण** | **५१,९७,३९९/-** |

२. कोकणभवन उपाहारगृहास पाईपलाईन गॅस पुरवठा करण्यासाठी महानगर गॅस लिमिटेडकडे सुरक्षा अनामत रक्कम व नोंदणी शुल्क भरणे तसेच महानगर गॅस लिमिटेडच्या गॅस मीटरपासून उपाहारगृहाच्या स्वयंपाकगृहापर्यन्त पाईपलाईन व इतर अनुषंगिक कामे करण्यासाठी वरीलप्रमाणे येणाऱ्या एकूण **रुपये ५१,९७,३९९/- (रुपये एकावण्ण लक्ष सत्याण्णव हजार तीनशे नव्याण्णव फक्त)** इतक्या अंदाजित खर्चास याद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर प्रशासकीय मान्यता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, परिच्छेद क्रमांक २७ (२)(अ) नुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

४. सदर कामासाठी येणारा खर्च मागणी क्रमांक ए-४, लेखाशीर्ष २०७५-संकीर्ण सर्वसाधारण सेवा, १०८-उपाहारगृह भांडार विभाग, (००)(०३) कोकणभवन उपाहारगृहे योजना (२०७५ ०१५१) (अनिवार्य), १३-कार्यालयीन खर्च याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२४१६०४४०६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Dadasaheb Sopan Khatal

Digitally signed by Dadasaheb Sopan Khatal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a310d57c42fb870fa7e7090329a6f40b05dc84ae61a81ed6b863484754bf19f1, serialNumber=8fe4511535712fe1236ed1973e619df1ad75bb7f10264e1988427f9496819bf2, cn=Dadasaheb Sopan Khatal
Date: 2019.10.24 16:08:31 +05'30'

**(दा.सो.खताळ)**
**महाव्यवस्थापक तथा अवर सचिव**
**मंत्रालय उपाहारगृहे**

**प्रत,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२) महालेखाकार-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
३) महालेखाकार-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) उपकोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई
६) उपसचिव, वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
७) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-३), मंत्रालय, मुंबई
८) महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे
९) सहा.लेखा अधिकारी/देयक लेखापाल, मंत्रालय उपाहारगृहे
१०)निवडनस्ती